भिक्षेकरी गृह, मुख्यलेखाशिर्ष २२३५ २८७८ या लेखाशीर्षाअंतर्गत सन २०२४-२५ करीता पुनर्वितरणाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. भिक्षेगृ -२०२५/ प्र.क्र.१७/ का-९**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १०/०३/२०२५

**वाचा-**

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि.१ एप्रिल, २०२४

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील भिक्षेकरी गृहांच्या आस्थापनेवरील खर्च भागविण्यासाठी मुख्य लेखाशीर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण अंतर्गत २२३५ २८७८ (अनिवार्य) या लेखाशीर्षाखाली निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. शासकीय भिक्षेकरी गृहांमध्ये मा. न्यायालयाच्या आदेशानुसार भिक्षेकऱ्यांना अटकावून ठेवण्यात येते. सदर भिक्षेकरी गृहांमध्ये प्रवेशितांना अन्न, वस्त्र व निवारा, वैद्यकीय मदत व प्रशिक्षण इ. सोयीसुविधा पुरविण्यात येतात. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील १४ शासकीय भिक्षेकरी गृहे/संस्थांकडून मागणी करण्यात आलेली तरतूद ही अर्थसंकल्पित तरतूदीपेक्षा अधिक असून १९- आहार खर्च या उद्दिष्टाखालील संभाव्य बचतीमधून अन्य उद्दिष्टांसाठी पुर्नवितरणाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत प्रस्ताव प्राप्त झाला होता. त्यानुसार वित्त विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार पुनर्वितरणाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. मागणी क्रमांक एक्स १ मुख्य लेखाशीर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण अंतर्गत “भिक्षेकरी गृहे” (अनिवार्य) १०४- वृद्ध विकलांग व निराश्रित व्यक्तीचे कल्याण, (०१)(०१) भिक्षेकरीगृह अनिवार्य २२३५-२८७८ या लेखाशीर्षाअंतर्गत १९- आहार खर्च या उद्दिष्टांसाठी अर्थसंकल्पित केलेल्या रु. ३१७.०३ लक्ष (अक्षरी तीन कोटी सतरा लाख तीन हजार रुपये) एवढी आहे. या तरतूदीमधून रु. ३६.५२ लक्ष (अक्षरी रु. छत्तीस लाख बावन्न हजार रुपये फक्त) इतका निधी खालील तक्त्यातील रकाना क्र. ६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पुनर्वितरणाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशीलवार शीर्ष | मूळ तरतूद | पुनर्वितरण वाढ/घट | पुनर्वितरणानंतरची तरतूद | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|---|
| १ | ०३- अतिकालीक भत्ता | १.२४ | (+) ०.६८ | १.९२ | ०.६८ |
| २ | १०-कंत्राटी सेवा | ६.२५ | (+) ६.७५ | १३.०० | ६.७५ |
| ३ | १४-भाडे पट्टी व कर | ५.२९ | (+) ४.६७ | ९.९६ | ४.६७ |
| ४ | २१- साधन, सामग्री व पुरवठा | ४१.३८ | (+)१८.९२ | ६०.३० | १८.९२ |
| ५ | ५०-इतर खर्च | ८.०० | (+)५.५० | १३.५० | ५.५० |
| ६ | १९-आहार खर्च | ३१७.०३ | (-) ३६.५२ | २८०.५१ | |
| | एकूण | | | | ३६.५२ |

२. सदर निधी पुनर्वितरणाद्वारे उपलब्ध करुन देत असल्याने पुर्ण तरतूद दि.३१ मार्च, २०२५ पर्यंत खर्च होईल याबाबतची पुर्ण जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची असेल.

३. सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमांमध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि.१ एप्रिल, २०२४ मधील मार्गदर्शक सुचना व त्या सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मध्ये नमूद अटी/शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात येईल याची संबंधितांनी दक्षता घ्यावी. यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७८/व्यय-६, दि. २७/०२/२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३१०१७१५०३७८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEELIMA PRAMOD CHAUDHARI

Digitally signed by NEELIMA PRAMOD CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2d492c577d5f8956310c91dc01ffb9a071206c77d27a3be4e52d7c1b29fcf933, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA21FB5959CBBFBF3AA97101D99F5D77D2333AE1AC39229E507A3EBF86EC6CD4, cn=NEELIMA PRAMOD CHAUDHARI
Date: 2025.03.10 17:15:54 +05'30'

**(नीलिमा चौधरी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
७. नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. निवड नस्ती (का-९)